**कार्यरत व सेवानिवृत्त राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांचे करिता वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजना.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण २०१४/प्र.क्र. ४०/२०१४ कोषा प्रशा-४**

मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २५ जून,२०१५

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१४ / प्र.क्र. ४०/२०१४ कोषा प्रशा-४, दि.९ जुलै, २०१४**

२) **शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकीर्ण २०१४ / प्र.क्र. ४०/२०१४कोषा प्रशा-४, दि.१३ नोव्हें, २०१४**

## प्रस्तावना -

१. शासकीय सेवेच्या अंतिम वर्षात पदार्पित शासकीय अधिकारी / कर्मचारी, व नुकतेच सेवा निवृत्त झालेले शासकीय अधिकारी / कर्मचारी व कुटुंबनिवृत्तीवेतनधारक यांच्यासाठी वैद्यकीय गट विमा योजना वरील क्रमांक १ च्या शासन निर्णय नुसार दि. १.७.२०१५ ते ३०.६.२०१६ या वर्षाकरिता सदर शासन निर्णयामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. शासकीय सेवेच्या अंतिम वर्षात पदार्पित शासकीय अधिकारी / कर्मचारी, व नुकतेच सेवा निवृत्त झालेले शासकीय अधिकारी / कर्मचारी व कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांच्यासाठी वैद्यकीय गट विमा योजना वरील क्रमांक १ च्या शासन निर्णयानुसार लागू करण्यात आलेली आहे. अ.क्र. १ व २ येथील शासन निर्णयानुसार ही योजना गटविमा तत्वावर आहे. सदर योजना सुरवातीस दि.१.७.२०१४ ते दि.३०.६.२०१५ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या सर्व गट अ, ब, क व ड अधिकारी / कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांना सक्तीची राहील, असे योजनेचे स्वरूप आहे. तथापि ज्या अधिकारी / कर्मचारी यांनी यापूर्वी अशाप्रकारची वैद्यकीय विमा पॉलिसी धारण केलेली आहे, तीच विमा पॉलिसी ग्राह्य धरून संबंधीत आहरण व संवितरण अधिकाऱ्याने खात्री करून प्रस्तुत विमाछत्र योजनेतून त्यांना वगळण्यात यावे.

## शासन निर्णय-

१. अ) शासन आता खालील अटींच्या अधीन राहून दि.१.७.२०१५ ते दि.३०.६.२०१६ या कालावधीत सेवानिवृत्त होणाऱ्या ज्या अधिकारी / कर्मचाऱ्यांनी यापूर्वीच इतर कंपन्यांकडून वैद्यकीय विमा पॉलिसी धारण केलेली आहे, त्यांना दि. ०९.०७.२०१४ रोजीच्या शासन निर्णयातील योजना सक्तीची राहणार नाही. याविषयी संबंधीत आहरण व संवितरण अधिकारी यांनी खात्री करून सूट द्यावी.

ब) सन २०१४-१५ मध्ये जमा झालेल्या प्रिमियमच्या तुलनेत सादर झालेल्या दाव्यांची रक्कम, दाव्यांच्या रक्कमांची थकबाकी, टीपीए वर्गणी यांची मिळून रक्कम ही ८५ % पेक्षा कमी असल्यामुळे दी न्यु इंडीया एश्युरन्स कंपनी लि. ने सन २०१५-१६ या वर्षाकरीता ५ % सुट दिलेली आहे. सदर कंपनीने हप्त्यांचे दर कमी केले आहेत. त्यानुसार दि.१.७.२०१५ ते दि.३०.६.२०१६ या कालावधीकरिता खालीलप्रमाणे वार्षिक विमाहप्ता लागू राहील.

| अ.क्र. | संवर्ग | विमाछत्र व विमा हप्त्याची रक्कम ( पती / पत्नी यांच्यासाठी एकत्रित फ्लोटर ) | | |
|---|---|---|---|---|
| १ | अखिल भारतीय सेवेतील अधिकारी व राज्य शासकीय गट अ संवर्ग अधिकारी | किमान | ऐच्छिक | |
| | | | | कमाल |
| | विमाछत्र रक्कम | ५ लक्ष | १० लक्ष | २० लक्ष |
| | विमा हप्ता | ₹ ८,९३०/- | ₹ १२,८२५/- | ₹ १९,७६०/- |
| २ | राज्य शासकीय कर्मचारी | | | |
| अ) | गट-ब संवर्ग | | | |
| | विमाछत्र रक्कम | ३ लक्ष | ४ लक्ष | ५ लक्ष |
| | विमा हप्ता | ₹ ७,४१०/- | ₹ ८,१७०/- | ₹ ८,९३०/- |
| ब) | गट-क संवर्ग | | | |
| | विमाछत्र रक्कम | १ लक्ष | २ लक्ष | ३ लक्ष |
| | विमा हप्ता | ₹ ५,७००/- | ₹ ६,५५५/- | ₹ ७,४१०/- |
| क) | गट-ड संवर्ग | | | |
| | विमाछत्र रक्कम | १ लक्ष | २ लक्ष | ३ लक्ष |
| | विमा हप्ता | ₹ ५,७००/- | ₹ ६,५५५/- | ₹ ७,४१०/- |

२. या रकमेवर केंद्र शासनाने लागू केल्यानुसार अनुज्ञेय (१४ %) सेवा कर आकारण्यात यावा.

३. सदर योजनेची उर्वरित कार्यपध्दती संदर्भ क्र.१ मधील तरतूदीनुसार राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२५१४१८३४०७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Narayan Bhaskar Ringane

Digitally signed by Narayan Bhaskar Ringane
DN: CN = Narayan Bhaskar Ringane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.06.25 14:40:50 +05'30'

**ना.भा.रिंगणे**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) राज्यपालांचे सचिव.

२) मुख्यमंत्र्याचे व उप मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

३) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
४) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग ,
५) प्रशासकीय विभागांच्या नियंत्राणाखालील सर्व कार्यालय प्रमुख
६) #प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा), मुंबई,
७) #प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा), मुंबई,
८) #सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
९) #सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
१०) #प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
११) #आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, (सर्व)
१२) #प्रबंधक महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई/नागपूर/औरंगाबाद
१३) सर्व विभागीय आयुक्त,
१४) सर्व जिल्हाधिकारी,
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
१६) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
१७) महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
१८) महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
१९) महालेखापाल-२(लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
२०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२) संचालक ,स्थानिक निधी लेखापरीक्षा मुंबई
२३) सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा,मुंबई,
२४) मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/
२५) संचालक, लेखा व कोषागारे महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२७)अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे,
२८)निवड नस्ती, वित्त विभाग,कोषा प्रशा-४.